तात्काळ





**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
दालन क्र.५५७, ५ वा मजला, विस्तार इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दूरध्वनी क्र ०२२-२२७९४१७२/२२७९३३४४ Email ID : vrishali.bhingarde@nic.in

---

क्रमांक: एएससी १५२३/प्र.क्र.८४/१४-अ दिनांक : २५ मे, २०२३.

प्रति,

सह/उप सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**विषय :-** पुणे येथील सांस्कृतिक कार्य संचालनालयातील तसेच राज्य माहिती आयोगाच्या कार्यालयातील रिक्त पदे प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी मंत्रालयीन विभागातील सहायक कक्ष अधिकारी व लिपिक-टंकलेखक संवर्गातील कर्मचाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्याबाबत.

**संदर्भ:-**
१) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का. १२, दिनांक १७-१२-२०१६
२) सा.प्र.वि. शा.नि. क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४,दिनांक ३१-०८-२०१७.
३) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का.१२, दिनांक १६-०२-२०१८
४) कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग (का.सहा) यांचे पत्र क्र. संकीर्ण २०१९/ प्र.क्र.४६/सहा, दि. १७-०५-२०२३.
५) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाचा नस्ती क्र. संकीर्ण ८२२३/ प्र.क्र.१६३/ सां.का.४ वरील प्रस्ताव.

महोदय/महोदया,

संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक १७-१२-२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भाधिन क्र.२ येथील दिनांक ३१-८-२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार खालील पदे प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी मंत्रालयीन विभागातील सहायक कक्ष अधिकारी व लिपिक-टंकलेखक संवर्गातील कर्मचाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात येत आहे.

२. (अ) पुणे येथील सांस्कृतिक कार्य संचालनालयातील अधिक्षक हे पद:-

| अ.क्र. | मंत्रालयीन विभागातील पदाचे नांव | प्रतिनियुक्तीने भरावयाचे पदनाम व संख्या | प्रतिनियुक्तीच्या ठिकाणावरील कार्यालयीन पत्ता |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | सहायक कक्ष अधिकारी | अधिक्षक<br>१ पद | सांस्कृतिक कार्य संचालनालय, पुणे |

**(आ)** राज्य माहिती आयोगाच्या विविध कार्यालयातील खालील पदे:-

| **अ.क्र.** | **कार्यालय** | **पदनाम** | | |
|---|---|---|---|---|
| | | **सहायक कक्ष अधिकारी** | **लिपिक-टंकलेखक** | **एकूण** |
| १ | राज्य माहिती आयोगाचे मुख्यालय, मुंबई | २ | २ | ४ |
| २ | राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ | १ | १ | २ |
| ३ | राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ | १ | १ | २ |
| ४ | राज्य माहिती आयोग, नाशिक खंडपीठ | १ | १ | २ |
| ५ | राज्य माहिती आयोग, औरंगाबाद खंडपीठ | १ | १ | २ |
| ६ | राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ | १ | २ | ३ |
| ७ | राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ | २ | १ | ३ |
| ८ | राज्य माहिती आयोग, बृहन्मुंबई खंडपीठ | २ | २ | ४ |
| एकूण | | ११ | ११ | २२ |

**३.** उपरोक्त पदावर प्रतिनियुक्तीने जाण्याकरिता इच्छुक मंत्रालयीन विभागातील सहायक कक्ष अधिकारी व लिपिक-टंकलेखकांनी आपल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे अर्ज सादर करावा **कोणत्याही परिस्थितीत या विभागाकडे थेट अर्ज करु नये**. थेट प्राप्त झालेल्या अर्जावर कोणतीही कार्यवाही करण्यात येणार नाही. संबंधित मंत्रालयीन विभागानी त्यांच्या विभागातील इच्छुक कर्मचाऱ्यांची शिफारस करतांना, सामान्य प्रशासन विभाग, शा.नि. दिनांक १७.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ५ (अ)(८) मध्ये नमूद केल्यानुसार नियमित नियुक्तीपासून किमान ७ वर्षे सेवा कालावधी पूर्ण करत नाहीत, अशा कर्मचाऱ्यांची या विभागाकडे शिफारस करू नये. तसेच सामान्य प्रशासन विभाग, शा.नि. दिनांक १६.०२.२०१८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १) ज) नुसार जे अधिकारी/कर्मचारी प्रतिनियुक्तीवरुन विभागात रुजू झाले आहेत त्यांच्या रुजू दिनांकापासून मूळ विभागात मूळ संवर्गात किमान ३ वर्षे कालावधी (Cooling Off) पूर्ण करत नाहीत अशा अधिकारी/कर्मचाऱ्यांची पुन्हा प्रतिनियुक्तीसाठी शिफारस करण्यात येऊ नये.

४. सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी इच्छुक कर्मचाऱ्यांचे अर्ज प्राप्त झाल्यानंतर संदर्भाधिन शासन निर्णयातील तरतूदीनुसार अर्जांची छाननी करुन आपल्या विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने इच्छुक कर्मचाऱ्यांचा प्रतिनियुक्तीचा प्रस्ताव खालील माहितीसह या कार्यासनाकडे दि. १२-०६-२०२३ पर्यंत पोहोचतील अशारीतीने (नोंदणी शाखेत पाठवू नये) पाठवावा :-

| | | |
|---|---|---|
| १) | अधिकारी/कर्मचाऱ्याचे संपूर्ण नांव व पदनाम | |
| २) | जन्मदिनांक | |
| ३) | प्रथम नियुक्तीचा दिनांक | |
| ४) | सेवानिवृत्तीचा दिनांक<br>[पहा शा.नि.दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुद ५ (ब) (६)] | |
| ५) | शैक्षणिक अर्हता | |
| ६) | भ्रमणध्वनी क्रमांक | |

<table>
<tr><td>७)</td><td>मागील ३ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती<br>(मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत)</td><td></td></tr>
<tr><td>८)</td><td>मत्ता व दायित्व सादर केली आहेत का? (दि.३१.३.२०२३ रोजीचे)</td><td></td></tr>
<tr><td>९)</td><td>५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास)</td><td></td></tr>
<tr><td>१०)</td><td>संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (कालावधी, पद व ठिकाण)
<table>
<tr><td>दिनांकापासून ते दिनांकापर्यंत</td><td>पद</td><td>प्रतिनियुक्तीचे ठिकाण (कार्यालय)</td></tr>
<tr><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td></td><td></td></tr>
</table></td><td></td></tr>
<tr><td>११)</td><td>संबंधित कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित आहे काय?</td><td></td></tr>
<tr><td>१२)</td><td>मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>१३)</td><td>प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे?</td><td></td></tr>
</table>

५. एकदा निवड झालेल्या कर्मचाऱ्याला त्याचे नांव मागे घेता येणार नाही. तसेच, आपल्या विभागातून सदर पदावर प्रतिनियुक्तीसाठी जाण्यास कोणीही कर्मचारी इच्छुक नसल्यास तसेही कृपया दि. १२-०६-२०२३ पर्यंत या कार्यासनास कळविण्यात यावे.

६. सद्य:स्थितीत मंत्रालयीन सहायक कक्ष अधिकारी व लिपिक-टंकलेखक संवर्गात मोठ्या प्रमाणात पदे रिक्त आहेत. यास्तव प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी नियुक्ती करण्यास विभागाने सहमती दिल्यास त्या कर्मचाऱ्याच्या बदल्यात/जागी संबंधित विभागास तातडीने कर्मचारी उपलब्ध करुन देणे शक्य होणार नाही याची विभागांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०५२५११४४१३८९०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**आपला,**

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.05.25 11:45:09 +05'30'

**( वि. बा. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत** :- १) सहसचिव/उपसचिव (का.सहा), सामान्य प्रशासन विभाग, १९ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई- ४०० ०३२

२) सहसचिव/उपसचिव (सां.का.४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

३) सा.प्र.वि./१४-अ (संग्रहार्थ).